**महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली सैन्यातील शौर्यपदक/सेवापदक धारकांना अनुज्ञेय रक्कम मंजूर करणेबाबत.**
एअर मार्शल सुनिल श्रीपाद सोमण, पुणे.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मगौपु-२०१५/प्र.क्र.२५१/२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: - ३० /१०/२०१५.

<u>वाचा</u>

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.शौपपु २०००/३०३/प्र.क्र.३१(२०००)/२८, दि. ३.०७.२०००.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. शौपपु-२००० / ३०३ /प्र .क्र .३१(२०००)/२८, दि. २४.८.२०००
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.शौपपु २००१/२८९८/प्र.क्र.१६(२००२)/२८, दि. १६.८.२००२.
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. शौपपु-२००८/प्र.क्र.४९/२८,दि. ०७.०५.२०११.
५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. शौपपु-२०११/प्र.क्र.२८३/२८, दि.२१.०७.२०११
६) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६२११/गौ.पु/प्रस्ताव/सैकवि-१६/८७२, दि.२२/०६/२०१५.

<u>प्रस्तावना</u>

संदर्भाधीन दिनांक ३.७.२००० व दिनांक ७.५.२०११ च्या शासन निर्णयांद्वारे महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेंतर्गत सैन्यातील १४ प्रकारच्या शौर्यपदक/सेवापदक धारकांना शासकीय अनुदान देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. एअर मार्शल सुनिल श्रीपाद सोमण, यांना राष्ट्रपती सचिवालयाच्या अधिसूचना क्रमांक १५ प्रेस/ २०१५, दिनांक २६ जानेवारी, २०१५, अन्वये “परम विशिष्ट सेवा पदक”, हे पदक प्रदान करण्यात आले आहे. सदर लाभार्थ्यास यापूर्वी “वायुसेना पदकाप्रित्यर्थ” रक्कम रु २३०००/- व “अति विशिष्ट सेवा पदकाप्रित्यर्थ” रक्कम रु.३४,०००/- इतकी, रक्कम संदर्भाधीन अनुक्रमे दिनांक २४/०८/२००० व दिनांक २१/०७/२०११ च्या शासन निर्णयानुसार अदा करण्यात आलेली आहे. संदर्भाधीन दि. ७.५.२०११ च्या शासन निर्णयामधील तरतूदीनुसार “परम विशिष्ट सेवा पदकाप्रित्यर्थ” देण्यात येणारी रक्कम रु.१,७०,०००/- यामधून “वायुसेना पदक” व “अति विशिष्ट सेवा पदकाप्रित्यर्थ” देण्यात आलेली एकूण रुपये ५७,०००/- इतकी रक्कम वजा जाता, उर्वरित रक्कम रुपये १,१३,०००/- या योजनेंतर्गत त्यांना एकरकमी अनुदान देण्याबाबतचा प्रस्ताव सैनिक कल्याण विभागाने दिनांक २२/०६/२०१५ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

## शासन निर्णय

उपरोक्त नमूद शासन निर्णय, व प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील तक्त्यात दर्शवल्याप्रमाणे, महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली अनुज्ञेय असलेली रु. १,१३,०००/- (रुपये एक लाख तेरा हजार फक्त) इतकी अनुदानाची रक्कम देण्यास शासनाची मंजूरी प्रदान करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | शौर्य/सेवापदक धारकाचे पदनाम, नाव व पत्ता | शौर्य/सेवापदक | पदक प्राप्त झाल्याचा दिनांक | अनुदानाची देय एकूण रोख रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | १४६८१ टी एअर मार्शल सुनील श्रीपाद सोमण, ७७०/४ सोनांजली, डेक्कन जिमखाना, भांडारकर रोड, पुणे- ४११० ०४. | परम विशिष्ट सेवा पदक | २६ जानेवारी,२०१५ | १,१३,०००/- |

२. या प्रयोजनार्थ होणारा रु.१,१३,०००/- (रुपये एक लाख तेरा हजार फक्त) इतका खर्च 'मागणी क्र.ए-४, लेखाशिर्ष २०७५, संकीर्ण सर्वसाधारण सेवा, ८०० - इतर खर्च, (००)(०५) शौर्यासाठी पारितोषिके (२०७५ ०११ ३) ०५ - बक्षिसे' या लेखाशीर्षाखाली सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच सदरचा खर्च हा मासिक निधी विवरणपत्रानुसार करण्याची दक्षता घेण्यात यावी. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. **सदरची रकक्म जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, पुणे यांनी कोषागार कार्यालय, पुणे येथून आहरीत करुन संबंधितांना विहीत पध्दतीने वितरीत करावी.**

३. वरील तक्त्यात नमूद केलेली संबंधित रक्कम लाभार्थ्यांची पात्रता काळजीपूर्वक तपासून विहीत मुदतीत देण्याच्या सूचना संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या क्षेत्रीय अधिका-यांना द्याव्यात व त्यासंबंधीचा अहवाल तात्काळ शासनास पाठवावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.शौपपु- २००० / ३०३ / प्र. क्र. ३१ (२००० )/२८, दिनांक ०३. ०७ .२००० व शासन निर्णय, क्र. शौपपु- २००८ / प्र. क्र. ४९ /२८, दिनांक ०७ . ०५ . २०११ मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०३१५५०२१५९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradeep Darade

Digitally signed by Pradeep Darade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pradeep Darade
Date: 2015.11.03 15:53:16 +05'30'

(प्र. ल. दराडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२,
४. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,

५. जिल्हाधिकारी, पुणे,

६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,

७. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),

८. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, पुणे,

९. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई,

१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,

११. १४६८१ टी एअर मार्शल सुनील श्रीपाद सोमण, ७७०/४ सोनांजली, डेक्कन जिमखाना, भांडारकर रोड, पुणे- ४११० ०४.

१२ वित्त विभाग (व्यय ४), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

१३ प्रत संग्रहार्थ.